भारतरत्न पं. भीमसेन जोशी शास्त्रीय संगीत
जीवन गौरव पुरस्कार्थी निवडीसाठी समिती
पुनर्गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्र. भीजोपु २०१८ (१३)/ प्र. क्र. २७४/सां.का.४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ ऑक्टोबर, २०१८

वाचा :- शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. रासांधो २०१० / शासंप्रो २०११/प्र.क्र.३०६/सां.का.४ दि. ३०.१.२०१३

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या सुवर्ण महोत्सवी वर्षाचे औचित्य साधून राज्य सांस्कृतिक धोरण २०१० ला जाहीर करण्यात येऊन त्याची अंमलबजावणी दिनांक १ जुलै, २०१० च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली. सदर धोरणातील मुद्यांनुसार भारतरत्न पं. भीमसेन जोशी शास्त्रीय संगीत जीवन गौरव पुरस्कार हा उपक्रम सुरु करण्यात आला. सदर पुरस्कारासाठी निवड करण्यासाठी दिनांक ३ जुलै, २०१५ व दिनांक १४ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयान्वये समिती पुनर्गठित करण्यात आली होती. तथापि, सदर समितीचा कार्यकाळ संपुष्टात आल्यामुळे नवीन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये भारतरत्न पं. भीमसेन जोशी शास्त्रीय संगीत जीवन गौरव पुरस्कार्थींची निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे.

**शासकीय सदस्य -**

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ३. | संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

**अशासकीय सदस्य -**

| | | |
|---|---|---|
| १. | उस्मान खाँ, सतार वादक, पुणे | सदस्य |
| २. | श्री. सदानंद नायमपल्ली, तबला वादक, मुंबई | सदस्य |
| ३. | श्री. शाम गुंडावार, गायक, चंद्रपूर | सदस्य |
| ४. | श्रीमती भारती वैशंपायन, गायक, कोल्हापूर | सदस्य |
| ५. | श्री. बाळ पुरोहित, गायक, नागपूर | सदस्य |
| ६. | श्री. विजय सरदेशमुख, गायक, पुणे | सदस्य |
| ७. | श्रीमती शुभदा पराडकर, गायक, औरंगाबाद | सदस्य |

२. या समितीची मुदत हा शासन निर्णय निर्गमित केल्यापासून ३ वर्षाच्या कालावधीसाठी किंवा समितीची पुनर्रचना होईपर्यंत एवढया कालावधीसाठी राहील.

**प्रवास व बैठक भत्ता :-** समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या क्रमांक, प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५/दि. ०३ मार्च २०१० च्या शासन निर्णयान्वये प्रवास भत्ता तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक बैठक २०१२/प्र.क्र.१/सेवा-५/दि.२४ मे २०१२ अन्वये बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

३. सदर खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (०१) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे, (०१) (०३) भारतरत्न पं. भीमसेन जोशी शास्त्रीय संगीत प्रोत्साहन योजना (२२०५ ३३२१) ५० इतर खर्च या लेखाशिर्षातून त्या-त्या वर्षी उपलब्ध असलेल्या मंजुर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून व लेखाधिकारी यांना या संबंधीच्या देयकांवर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०१९१७००३४७५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2018.10.19 17:05:09 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक
३. उप सचिव ( सां. का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
५. निवड समितीचे सर्व अशासकीय सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्यामार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२ प्रती)
७. महालेखापाल (महाराष्ट्र-१) (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता )
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसं), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती, सां.का.४